**नागरी संस्थां संदर्भात पहिल्या वित्त आयोगाने केलेल्या शिफारशीस अनुसरुन राज्यातील महानगरपालिकांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत सूचना.**

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विकास
शासन परिपत्रक क्र. जीईएन १०२०००/१४८१/प्र.क्र. ९/०१/नवि-२४
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :-२८ फेब्रुवारी, २००१

**प्रस्तावना** :- महानगरपालिकेच्या उत्पन्नात वाढ होणे, अमान्य रकमा दोन वर्षाहून अधिक काळ लेखापरिक्षणाचे आक्षेपाधीन न राहणे, पाण्याचा अपव्यय टाळण्यासाठी उपयायोजना करणे, आरोग्य व स्वच्छता विषयक विशेष सेवा सुधारण्यासाठी योग्य असे व्यवस्थापन राबविणे, आणि आपत्ती निवारण निधी उभारणेबाबत पहिल्या राज्य वित्त आयोगाने शासनास शिफारशी कलेल्या आहेत. या शिफारशी राज्य शासनाने स्विकारलेल्या आहेत. या शिफारशीच्या अनुषंगाने महानगरपालिकांतर्फे सुयोग्य अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने महानगरपालिकांना सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात राज्यतील सर्व महानगरपालिकांना पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**परिपत्रक** :- राज्यातील नागरी संस्थां (महानगरपालिका) यांचेबाबतीत पहिल्या राज्य वित्त आयोगाने केलेल्या शिफारशी लक्षात घेऊन या शिफारशींची सर्व महानगरपालिकांतर्फे कार्यवाही होण्यासाठी खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

## अ) महानगरपालिकेच्या उत्पन्नात वाढ करणे.

१) जकात कराचे कमाल दर गाठण्यासाठी नागरी संस्थानी प्रयत्न करावा तसेच नियमानुसार विहित केलेल्या किमान व कमाल दराचे कालानुरुप पुर्नविलोकन करावे

२) व्यापारी संकुलाद्वारे निर्माण केलेल्या परंतु वापरात नसलेल्या सोईची संख्या फारशी नसेल तर या सोई पासून उत्पन्नाचे नुकसान होणे हे टाळण्यासाठी सोईचा योग्य वापर करावा.

३) व्यापारी संकुल उभारणीमागे नागरी संस्थांचे उत्पन्न वाढीबाबत व निव्वळ व्यापारी उलाढालीचे साधन म्हणून वापर करावा.

४) व्यापारी संकुलापासून नागरी संस्थांना उत्पन्न मिळणे हे निर्विवाद सत्य असले तरी या उत्पन्नाची एकूण भांडवली गुंतवणूकीची सांगड घालणे अत्यंत महत्वाचे आहे. ही गुंतवणूक दिर्घकालीन मुदतीचे ठेवीत बँकेमध्ये

किंवा इतरत्र केली असता जे उत्पन्न प्राप्त झाले असते किमान तेवढया दराने तरी व्यापारी संकुलापासून उत्पन्न मिळावे यादृष्टीने प्रयत्न करावेत.

५) कर चुकवेगीरी संदर्भात दंडात्मक तरतुदी कठोर करण्यात याव्यात.

## ब) अमान्य रकमा दोन वर्षाहून अधिक काळ लेखापरिक्षणाचे आक्षेपाधीन न ठेवणे

१) अमान्य रकमाबाबत लेखापरिक्षेचा अहवाल पडताळल्या पासून निर्णय घेऊन त्या संबंधित व्यक्तींकडून किंवा स्वतंत्रपणे त्याची वसुली करण्याचा निर्णय घ्यावा किंवा योग्य वाटल्यास केवळ तांत्रिक माहितीतून उद्‌भवणारे आक्षेप दूर करुन टाकावेत. ज्या योगे अशी कुठलीही रक्कम दोन वर्षाहून अधिक कालावधीत आक्षेपाधित राहू शकणार नाही. तसे आधीच्या थकित रकमांबाबत या प्रकारचा आढावा घेऊन कार्यवाही करावी.

## क) पाण्याचा अपव्यय टाळण्यासाठी उपयायोजना करणे

१) महानगरपालिकांनी पाण्याचा अपव्यय टाळण्यासाठी विशेष प्रयत्न करावेत आणि सार्वजनिक नळांची संख्या मर्यादित ठेववी. त्याच प्रमाणे पाण्याचा काटकसरीने उपयोग होण्यासाठी घरातील नळामधून पाण्याचा अपव्यय होणार नाही, यासाठी जनतेत जागृती निर्माण करावा.

२) पाणी वितरण व्यवस्थेत पाण्याचा अपव्यय कमाल १५% या मर्यादेत राहिल याची दक्षता घ्यावी.

३) पाणी पुरवठा योजनांबद्दल जनतेमध्ये प्रसार माध्यमाद्वारे जनजागृती करावी, जेणेकरुन पाण्याचा अपव्यय टळेल.

पाणी पुरवठा योजना "ना नफा ना तोटा" या तत्वावर चालविण्यासाठी दरामध्ये वेळोवेळी आवश्यक त्या सुधारणा कराव्यात.

पाणी पुरवठा दर / सेवादरांची वसुली थकित राहू नये यास्तव किमान देखभाल व दुरुस्तीचा खर्च तरी वसूल होईल अशा प्रकारे हे दर ठरविण्यात यावेत.

## ड) आरोग्य व स्वच्छता विषयक विशेष सेवा सुधारण्यासाठी योग्य असे व्यवस्थापन राबविणे

१) महानगरपालिकांनी आरोग्य व स्वच्छता विषयक सेवा पुरविण्यासाठी योग्य असे व्यवस्थापन राबवावे. यासाठी महानगरपालिकांनी आवश्यक तो खर्च उपलब्ध निधीतून करावा. सार्वजनिक आरोग्य आणि स्वच्छता यामधील काही बाबींचे व्यवस्थापन करतांना खाजगीकरणाचा मार्ग अवलंबावा.

२) महानगरपालिकांनी मालमत्ता धारकांवर मलनि:सारण कर आकारीत असल्यामुळे या योजनांच्या देखभाल / दुरुस्तीकडे आणि यामध्ये सुधारणा करण्याकडे पुरेसे लक्ष देणे आवश्यक आहे. भुयारी गटार योजनेअंतर्गत सांडपाण्यावर प्रक्रिया झाल्यानंतर जे निरुपयोगी पाणी सोडले जाते अशा पाण्याचा उपयोग जवळच्या क्षेत्रामध्ये सिंचनासाठी करण्याचा प्रयत्न करावा.

३) कमी खर्चाच्या स्वच्छता योजना महानगरपालिकानी त्यांच्या क्षेत्रात यशस्वीरितीने कार्यान्वीत करण्यासाठी प्रयत्न करावा.

### इ) आपत्ती निवारण निधी / घसारा निधी उभारणे

प्रत्येक महानगरपालिकेने तिच्या स्वत:च्या उत्पन्नाच्या अर्ध्या टक्क्या इतकी रक्कम दरवर्षीच्या अर्थसंकल्पात वेगळी काढून ती "आपत्ती निवारण निधी" म्हणून वेगळा ठेवावी.
महानगरपालिकेने विविध मालमत्तांसाठी विहीत दराने घसारा निधी निर्माण करावा.

### (फ) खाजगी करणाचा पर्याय

खाजगी कंत्राटदारांकडून करुन घेतलेल्या कामांचा दर्जा खराब आहे अशा तक्रारींना वाव असू नये म्हणून पुरेसे निकष लावून खाजगी करणाचा पर्याय उपलब्ध असावा.

सर्व महानगरपालिकांनी उपरोक्त सूचनांनुसार कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

र. वि. झोपे

( र. वि. झोपे )
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव